**चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्राच्या मुलींच्या वसतीगृहाचे (G+२) अवस्था-१ चे बांधकाम (Construction of Girls Hostel) करण्याच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. वनबां-२०१६/प्र.क्र.५५/फ-९**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- १५ मार्च, २०१७**

वाचा :- १) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र. कक्ष २४(३)/वअ/ ८४८/२०१६-१७, दि. १४.१२.२०१६ चे पत्र.
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. वनबां-२०१६/प्र.क्र. ५५/फ-९, दिनांक १०.३.२०१६
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. वनबां-२०१६/प्र.क्र. ५५/फ-९, दिनांक ३१.३.२०१६

**प्रस्तावना :-**

चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्राच्या मुलींच्या वसतीगृहाचे (G+२) अवस्था-१ चे बांधकाम (Construction of Girls Hostel) करण्याच्या रु.३४०.८३ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. परंतु, बांबूचा जास्तीत जास्त वापर करून, वसतीगृहाच्या इमारतीचे अंदाजपत्रक तयार करण्यात यावे, असे ठरले. त्या दृष्टीने इमारतीचे बांधकाम बांबूचा वापर करून, तयार करण्याच्या अनुषंगाने सुधारित अवस्था-१ चे अंदाजपत्रक तयार केलेले असून, त्याची अंदाजपत्रकीय रक्कम रु.४३८.७० लक्ष एवढी झालेली आहे. सुधारीत अंदाजपत्रकात बांबूचा वापर करून, तयार करण्यात येत असल्याने, मुळ अंदाजपत्रकीय रकमेत वाढ झालेली आहे. सबब, चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्राच्या मुलींच्या वसतीगृहाचे (G+२) अवस्था-१ चे बांधकामाच्या (Construction of Girls Hostel) सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्राच्या मुलींच्या वसतीगृहाचे (G+२) अवस्था-१ चे बांधकामाच्या (Construction of Girls Hostel) सुधारीत अंदाजपत्रकाच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाने अंदाजपत्रकाचे परिगणना केल्यानंतर रू.४३१.७८ लक्ष रकमेच्या अंदाजपत्रकास सोबत जोडलेल्या प्रपत्रानुसार सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या सहमतीस व खालील अटींच्या अधीन राहून, शासनाची प्रशासकीय मान्यता **(वित्तीय मान्यता वगळून)** देण्यात येत आहे. (सदर बांधकामाच्या बाबी सोबत जोडलेल्या प्रपत्राप्रमाणे आहेत.)

१. प्रस्तुत कामाचे नकाशे खाजगी वास्तुविशारदांनी तयार केलेले आहे. तथापि, मांडणी नकाशे व विस्तृत नकाशे सरकारी वास्तुशास्त्रज्ञांकडून मंजूर करून घ्यावेत.

२. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाचा शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१४/प्र.क्र. ९६/इमा-३, दिनांक ८.७.२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करावी.

३. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पुर्तता करुन घ्यावी.

४. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

५. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग शासन निर्णय क्र.इएनव्ही/२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१ दि.१० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र. १, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१६११५६०२३५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2017.03.16 11:58:20 +05'30'

**(प्रकाश महाजन)**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), चंद्रपूर.
५. विभागीय वन अधिकारी, चंद्रपूर
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-३२.
८. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
९. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
१०. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)

# प्रपत्र

**Name of Work :-** Construction of Girls Hostel Building for Bamboo Training and Research Center at Chichpalli Dist. Chandrapur

## Recapitulation Sheet

| Sr. No | Perticulars | Amount in Rs |
|---|---|---|
| 1 | Estimate- Hostel Building | 2,72,55,000.00 |
| 2 | Add 6% for Electrification (Internal) | 16,35,300.00 |
| 3 | Add 8% for External Water Supply & Sanitation | 21,80,400.00 |
| 4 | Add 5% for External Electrification | 13,62,750.00 |
| 5 | Add 10% for Furniture & Fixtures | 27,25,500.00 |
| 6 | Add L.S. for Fire Fighting Arrangement / System | 5,00,000.00 |
| | **Total** | **3,56,58,950.00** |
| 7 | Add 4% for Contingencies Charges | 14,26,358.00 |
| 8 | Add 5% for Centage Charges | 17,82,948.00 |
| 9 | Add 7.5 % Price Variation | 26,74,421.00 |
| 10 | Add 15 % Service Tax on 40% cost of proper building Cost | 16,35,300.00 |
| | **Grand Total** | **4,31,77,977.00** |
| | **Say Rs** | **4,31,78,000.00** |

********************